२०१६

# आरती संग्रह









कीर्ति कॉम्प्युटर इन्स्टिटयूट

## ।। आरती गणपतीची ।।

सुखकर्ता दु:खहर्ता वार्ता विघ्नाची ।
नुरवी पुरवी प्रेम कृपा जयाची ।।
सर्वांगी सुंदर उटि शेंदुराची ।
कंठी झळके माळ मुक्ताफळाची ।।१।।
जय देव जय देव जय मंगलमूर्ती ।।
दर्शनमात्रे मन कामनापुरती ।। धृ ।।
रत्नखचित फरा तुज गौरीकुमरा ।
चंदनाची उटी कुम्कुम्केशरा ।।
हिरेजडीत मुकुट शोभतो बरा ।
रुणझुणती नूपुरे चरणी घागरिया । जय. ।।२।।
लंबोदर पितांबर फणिवरबंधना ।
सरळ सोंड वक्रतुंड त्रिनयना ।।
दास रामाचा वाट पाहे सदना ।
संकटी पावावे, निर्वाणी रक्षावे सुरवरवंदना ।।
जय देव जय देव जय मंगलमूर्ती । दर्शन. ।।३।।

# ।। आरती गणपतीची ।।

तू सुखकर्ता, तु दु:खहर्ता विघ्नविनाशक मोरया
संकट रक्षी शरण तुला मी गणपती बप्पा मोरया ।। धृ ।।

मंगलमूर्ती तू गणनायक वक्रतुंड तू सिध्दिविनायक
तुझिया व्दारे आज पातलो ये इच्छित मज द्याया ।। १ ।।

तु संकलांचा भाग्यविधाता तू विद्येचा स्वामी दाता
ज्ञानदीप उजळुनी आमच्या निववी नैराश्याला ।। २ ।।

तू माता तू पिता जगी या ज्ञाता तू सर्वस्व जगी या
पामर मी स्वर उणे भासती तुझी आरती गाया ।। ३ ।।

# ।। आरती गणपतीची ।।

शेंदुर लाल चढायो अच्छा गजमुखको
दोंदिल लाल बिराजे सुत गौरीहरको
हाथ लिये गुडलड्डू साई सुरवरको
महिमा कहे न जाये लागत हूं पदको
जय जय जी गणराज विद्यासुखदाता
धन्य तुम्हारे दर्शन मेरा मन रमता ।। धृ ।।

अष्टो सिध्दी दासी संकटको बैरी
विघ्नविनाशक मंगलमूरत अधिकारी
कोटी सूरजप्रकाश ऐसी छबी तेरी
गंडस्थलमदमस्तक झूले शशिबिहारी
जय जयजी गणराज विद्यासुखदाता
धन्य तुम्हारे दर्शन मेरा मन रमता ।। धृ ।।

संतत संपत सबही भरपूर पावे
ऐसेतुम महाराज मोको अति भावे
गोसावीनंदन निशिदिन गुण गावे
जय जयजी गणराज विद्यासुखदाता
धन्य तुम्हारे दर्शन मेरा मन रमता ।। धृ ।।

# ।। आरती विठोबाची ।।

येई हो विठ्ठलमाझे माउली ये ।
निढळावरी कर ठेवुनि वाट मी पाहे ।।धृ.।।

आलिया गेलिया हाती धाडी निरोप ।।
पंढरपुरी आहे माझा मायबाप ।। येई. ।।१।।
पिवळा पीतांबर कैसा गगनी झळकला ।
गरुडावरि बैसोनि माझा कैवारी आला ।।येई.।।२।।

विठोबाचे राज्य आम्हां नित्य दिपवाळी ।।
विष्णुदास नामा जीवेभावे ओवाळी ।।
येई हो विठ्ठले माझे माउली ये ।

असो नसो भाव आम्हां तुझिया ठाया ।
कृपादृष्टी पाहे माझ्या पंढरीराया ।।४।।

## ।। आरती श्रीज्ञानदेवाची ।।

आरती ज्ञानराजा । महाकैवल्यतेजा ।

सेविती साधुसंत ।

मनु वेधला माझा ।। आरती. ।।धृ।।

लोपलें ज्ञान जगी हित नेणती कोणी ।

अवतार पांडुरंग ।

नाम ठेविलें ज्ञानी ।। आरती. ।।१।।

कनकाचे ताट करीं । उभ्या गोपिका नारी ।

नारद तुंबरही ।

साम गायन करी ।। आरती. ।।२।।

प्रगट गुह्य बोले । विश्व ब्रह्मचि केलें ।

रामा जनार्दनी ।

पायी मस्तक ठेविलें ।।

आरती ज्ञान राजा ।। महा. ।।३।।

रघुतिलक राम-दासा अंतरी ।। जय देव. ।।४।।

# ।। आरती विठोबाची ।।

युगे अठ्ठावीस विठेवरी उभा । वामांगी रखुमाई दिसे ।
दिव्य शोभा ।। पुंडलीकाचे भेटी परब्रम्ह आलें गा ।
चरणी वाहे भीमा उध्दरी जगा ।।धृ.।।
जय देव जय देव जय पांडुरंगा ।
रखुमाईवल्लभा राईच्या वल्लभा पावे जिवलगा ।।१।।
तुलशीमाळा गळां कर ठेवुनि कटीं ।
कांसे पीतांबर कस्तुरी लल्लाटीं ।। देव सुरवर नित्य येती भेटी ।
गरुड हनुमंत पुढे उभे राहती ।। जय. ।।२।।
धन्य वेणूनाद अनुक्षेत्रपाळा । सुवर्णाची कमळें वनमाळागळां ।।
राई रखुमाबाई राणीया सकळां ।
ओवाळिती राजा विठोबा सांवळा ।। जय. ।।४।।
ओवाळूं आरत्या कुर्वंडया येती ।
चंद्रभागेमाजी सोडुनिया देती । दिंडया पताका वैष्णव नाचती ।
पंढरीचा महिमा वर्णांवा किती ।। जय. ।।४।।
आषाढी कार्तिकी भक्तजन येती ।
चंद्रभागेमध्ये स्नानें जे करिती ।।
दर्शनहेळामात्रें तयां होय मुक्ती ।
केशवासी नामदेव भावें ओवाळिती ।।
जय देव जय देव जय. ।।५।।

## ।। आरती श्रीतुकारामाची ।।

आरती तुकारामा ।
स्वामी सदगुरुधामा ।
सच्चिदानंदमूर्ती ।
पाय दाखवी आम्हां ।। आरती ।।धृ.।।

राघवें सागरात ।
पाषाण तारिलें ।
तैसे हे तुकोबाचे ।
अभंग उदकीं रक्षिले ।।आरती.।।१।।

तुकितां तुलनेसी ।
ब्रम्ह तुकासी आलें ।।
म्हणोनि रामेश्वरें ।
चरणीं मस्तक ठेविलें ।।
आरती तुकारामा ।।२।।

## ।। आरती श्रीशंकराची ।।

लवथवती विक्राळा ब्रह्मांडी माळा ।
विषें कंठ काळा त्रिनेत्री ज्वाळा ।
लावण्य सुंदर मस्तकी बाळा ।
तेथुनिया जळ निर्मळ वाहे झुळझुळा ।।१।।
जय देव जय देव जय श्रीशंकरा ।।
आरती ओवाळूंतुज कर्पुरगौरा ।। धृ.।।
कृर्परगौरा भोळा नयनी विशाळा ।।
अर्धांगी पार्वती सुमनांच्या माळा ।
विभुतीचे उधळण शितकंठ नीळा ।
ऐसा शंकर शोभे उमावेल्हाळा ।। जय देव. ।।२।।
दैवी दैत्य सागर - मंथन पै केले ।
त्यामार्जी अवचित हलाहलसापडले ।
तें त्वां असुरपणे प्राशन केले ।
नीलकंठ नाम प्रसिध्द झाले ।। जय देव. ।।३।।
व्याघ्रांबर-फणिवरधर सुंदर मदनारी ।
पंचानन मनमोहन मुनिजनसुखकारी ।
शतकोटीचें बीज वाचे उच्चारी ।
रघुतिलक राम-दासा अंतरी ।। जय देव. ।।४।।

## ।। आरती श्रीदेवीची ।।

दुर्गे दुर्घट भारी तुजविण संसारी ।
अनाथनाथे अबें करुणा विस्तारी ।
वारीं वारीं जन्म मरणांते वारीं ।
हारी पडलों आतां संकट निवारीं ।
जय देवी जय देवी जय महिषासुरमदिनी ।
त्रिभुवनभुवनीं पाहतां तुजऐसी नाहीं ।
चारीं श्रमले परंतु न बोलवे काहीं ।।
साहीं विवाद करितां पडलों प्रवाही ।
ते तूं भक्तालागी पावसी लवलाही ।। जय. ।।२।।
प्रसन्नवदने प्रसन्न होसी निजदासां ।
क्लेशांपासुनी सोडवी तोडी भवपाशा ।
अंबे तुजवांचून कोण पुरविलआशा ।
नरहरि तल्लीन झाला पदपंकजलेशा ।।
जय देवी जय देवी जय महिषासुरमदिनी ।।
सुरवर ईश्वरवरदे तारक. ।।३।।

।। श्री गणेशप्रसाद ।।

घालीन लोटांगण, वंदिन चरण ।।
डोळ्यांनी पाहिन रुप तुझे ।।
प्रेमे आलिंगन आनंदे पूजिन,
भावे ओवाळिन म्हणे नामा ।।१।।
त्वमेव माता च पिता त्वमेव
त्वमेव बंधुश्च सखा त्वमेव
विद्या द्रविणं त्वमेव संर्व मम देव देव ।।२।।
कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा बुध्द्यात्माना वां
प्रकृतिस्वभावात् ।।
करोमि सद्यत् सकलं परस्मै नारायणायेति समर्पयामि ।।३।।
अत्युतं केशव रामनारायणं
कृष्णदामोदरं वासुदेवं हरिम् ।।
श्रीधरं माधवं
गोपिकावल्लभं जानकीनायकं रामचंद्र भजे ।।४।।
हरे राम हरे राम राम हरे हरे
हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे ।।५।।

# ।। श्रीगणपतिस्तोत्रम् ।।

(छंद् – अनुरूष्टुप्)

साष्टांग नमन हे माझे गौरीपुत्रा विनायका ।
भक्तीनें स्मरतां नित्य आयुःकामार्थ साधती ।। 1 ।।
प्रथम नावं वक्रतुंड दुसरें एकदंत ते ।
तिसरें कुष्णपिंगाक्ष चवथे गजवस्त्र ते ।। 2 ।।
पांचवे श्रीलंबोदर सहावें विकट नांव ते ।।
सातवें विघ्नराजेंद्र आठवें धुम्रवर्ण तें ।। 3 ।।
नववे श्रीभालचंद्र दहावे श्रीविनायक ।।
अकरावे गणपति बारावें श्रीगजानन ।। 4 ।।
देवनावें अशी बारा तीन संध्या म्हने नर ।
विघ्नभिति नसे प्रभो । तूं सर्वसिध्दिद ।। 5 ।।
विद्यार्थ्याला मिळे विद्या धनार्थ्याला मिळे धन ।
पुत्रार्थ्याला मिळे पुत्र मोक्षार्थ्याला मिळे गति ।। 6 ।।
जपता गणपतिस्तोत्र सहा मासात हे फळ ।
एक वर्ष पूर्ण होतां मिळे सिध्दि न संशय ।। 7 ।।
नारदांनी रचिलेलें झाले संपूर्ण स्तोत्र हे ।
श्रीधराने मराठीत पठण्य अनुंवादिलें ।। 8 ।।

# keerti®

COMPUTER INSTITUTE

CREATING IT PROFESSIONALS

# BCA

BACHELOR OF COMPUTER APPLICATION

- MS-Office
- D.T.P.
- Adv. Excel
- Adv. Tally.ERP 9
- Illustrator
- InDesign
- Hardware & Networking
- Programming




- क्रिएटीव्ह डिजीटल आर्टस
- स्मॉल बिझनेस मॅनेजमेंट्
- बँकिंग फायनान्स ॲण्ड इन्श्युरन्स
- हार्डवेअर ॲण्ड नेटवर्किंग

## ₹ 500/- To ₹ 2,000/-

On Keerti Package Courses

## Discount Voucher



For More Information call on 9029341200

# कीर्ति कॉम्प्युटर इन्स्टिटयूट







**AMBERNATH (E) CENTRE**

Mob.: 8600769938

**BADLAPUR (W) CENTRE**

Tel.: 0251-2675707 / 7387672205

**BHAYANDER (E) CENTRE**

Mob.: 7387400488

**BORIVALI (W) CENTRE**

Tel.: 022-28918460 / 8655030234

**DADAR (W) CENTRE**

Tel.: 022-243600339 / 24389995 / 9029043234

**DONGRI CENTRE**

Tel.: 022-23704419 / 9820105471

**GIRGAON CENTRE**

Tel.: 022-23840905 / 8080123355

**THANE (W) STN. CENTRE**

Tel.: 25362909 / 9594288747

**VASHI CENTRE**

Tel.: 022-27800037 / 7303469946 / 9768238621